# महाराष्ट्र शासन

क्रमांक: बीयुडी-१६२०/प्र.क्र.५२/२८-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १९ ऑगस्ट, २०२०

**विषय :-** शिर्डी व अमरावती विमानतळ विकासासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

वाचा :-१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६.०४.२०२०.

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ४.०५.२०२०.

**शासन ज्ञापन** :-

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी पहिल्या तिमाहीकरिता एकूण वार्षिक तरतुदीच्या १५ ते २५ टक्के निधी वितरणाबाबत मार्गदर्शक सूचना वित्त विभागाने त्यांच्या दि.१६.०४.२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये निर्गमित केल्या आहेत. सन २०२०-२१ या वर्षात ३०५३-०१६४ या लेखाशीर्षाखाली **राज्यातील विविध विमानतळांच्या विकासाकरिता** रु.७८.०० कोटी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. यापैकी, १० टक्के मर्यादेत म्हणजेच रु.७.८० कोटी निधी वित्त विभागाने वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेला आहे.

२. वितरणासाठी उपलब्ध रु.७.८० कोटी निधीपैकी शिर्डी व अमरावती विमानतळांसाठी खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे रु.७.५० कोटी निधी महाराष्ट्र विमानतळ विमानतळ विकास कंपनीस उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**योजनेचे नाव- मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१६४) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)**

| खर्चाची बाब | सन २०२०-२१ ची मूळ अर्थसंकल्पिय तरतूद | मूळ अर्थसंकल्पिय तरतूदीच्या १० % मर्यादेत उपलब्ध तरतूद | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|
| शिर्डी विमानतळाचा विकास | ७८,००,००,००० | ७,८०,००,००० | **५,२५,००,०००** |
| अमरावती विमानतळाचा विकास | | | **२,२५,००,०००** |
| | **एकूण** | **७,८०,००,०००** | **रु.७,५०,००,०००** |

**( अक्षरी रक्कम रुपये सात कोटी पन्नास लाख फक्त )**

३. उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१६४) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो विहीत मुदतीत खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत खर्चाचा आढावा वेळोवेळी शासनास सादर करण्यात यावा.

५. हे शासन ज्ञापन वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१४३/२०२०/व्यय-४, दि.२४.०६.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०२००८१९१२१७३९४९०७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sanjeev R Keluskar

Digitally signed by Sanjeev R Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, serialNumber=78be615e7dd51ebb89a43e2d8f1b14979bf8f5ae2c63e3a7fe41c5716996cd4b, cn=Sanjeev R Keluskar
Date: 2020.09.04 12:19:55 +05'30'

**( संजीव केळुसकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती.